**डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद येथील विद्यापीठ व महाविद्यालय न्यायाधिकरणावरील पीठसीन अधिकारी यांच्या नियुक्तीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायाप्र-२०१८/प्र.क्र.१५२/१८/विशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीखः- २६ डिसेंबर, २०१९

वाचा :-

१. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. युएसजी१३९१/२०८९/विशि-४, दि.१९ ऑगस्ट, १९९५
२. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१४/(५१४/१४)/विशि-१, दि.११ जून, २०१५
३. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.न्यायाप्र-२०१७/प्र.क्र.३६२/१७/विशि-१, दि.०९ ऑक्टोबर, २०१८

प्रस्तावना :-

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ च्या कलम ५८ अन्वये शासनास प्राप्त असलेल्या अधिकाराचा वापर करून अकृषि विद्यापीठांकरीता विद्यापीठ व महाविद्यालय न्यायाधिकरण स्थापन करण्याबाबचे आदेश संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद येथील विद्यापीठ व महाविद्यालय न्यायाधिकरणावरील पीठासीन अधिकारी यांच्या नियुक्तीबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले. तद्नंतर सदरहू १९९४ चा अधिनियम, महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ अन्वये सुधारित करण्यात आलेला आहे. या अधिनियमाच्या कलम ८० मध्ये पीठासीन अधिकारी यांच्या नियुक्तीची तरतुद आहे.

महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील तरतुदीनुसार डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद येथील विद्यापीठ व महाविद्यालय न्यायाधिकरणावरील रिक्त असलेल्या पीठासीन अधिकारी या पदावर नवीन पीठासीन अधिकारी यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासन या शासन निर्णयान्वये डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद येथील विद्यापीठ व महाविद्यालय न्यायाधिकरण येथील रिक्त असलेल्या पीठासीन अधिकारी या पदावर श्री. एस. के. कोतवाल, सेवानिवृत्त न्यायमूर्ती, मा. उच्च न्यायालय, मुंबई यांची तीन वर्षाच्या कालावधीसाठी त्यांनी प्रत्यक्ष पद धारण केल्याच्या दिनांकापासून नियुक्ती करण्यात येत आहे.

२. श्री. एस. के. कोतवाल, सेवानिवृत्त न्यायमूर्ती, मा. उच्च न्यायालय, मुंबई यांना संदर्भ क्र.१ व ३ येथील शासन निर्णयात नमूद सेवाशर्ती लागू राहतील.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१९१२२६१७२२२०२५०८ असा आहे. सदरहू शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Eknath Sable

Digitally signed by Vijay Eknath Sable
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad74dd20b49c8ab0bc83f54f3d9c91571a6cd47aeb9a9f05783d44cafe7a7d8e, serialNumber=ad8df0c87ab8e6c9f8574ab838dd4c466ebe81828f43e76bfa02129f8e862cd2, cn=Vijay Eknath Sable
Date: 2019.12.26 17:31:36 +05'30'

**( विजय साबळे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई,
२. मा. श्री. एस. के. कोतवाल, सेवानिवृत्त न्यायमूर्ती, उच्च न्यायालय, मुंबई,
३. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. कुलगुरू, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद,
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर-२, महाराष्ट्र,
६. महालेखापाल (लेखा परीक्षा) नागपूर-२, महाराष्ट्र,
७. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
८. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण,नांदेड, जळगाव, औरंगाबाद,
१०. कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद,
११. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद,
१२. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी,
१३. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव,
१४. उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व कार्यासने,
१५. अवर सचिव (कार्या-४) विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. निवड नस्ती (विशि-१).